यवतमाळ नगरपरिषद हद्दीतील
शहरातून जाणाऱ्या राज्यमार्गांना
अवर्गीकृत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- रवियो-२०१७/प्र.क्र.३/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १८ मार्च, २०१७.

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचे पत्र क्र.का.२(२)/रस्ते अवर्गीकृत /७२, दिनांक ०६/०१/२०१७.
२) मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचे पत्र क्र. का.२(२) /रस्ते अवर्गीकृत / २०१७ /६२०, दि. १०/०२/२०१७.
३) मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचे पत्र क्र. का.२(२)/रस्ते अवर्गीकृत /७१८, दि. १७/०२/२०१७.

**प्रस्तावना :-**

यवतमाळ जिल्ह्यातील यवतमाळ नगरपरिषद हद्दीमधून जाणाऱ्या चार राज्य मार्गाकरीता वळणरस्त्यांची कामे पूर्ण झाली आहेत. सदर बाह्यवळण रस्त्यावरुन वाहतुक सुरळीतपणे होत असल्याने, सदर रस्त्यांची यवतमाळ नगरपरिषद हद्दीतील लांबी अवर्गीकृत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांनी नगरपरिषद हद्दीतील सदर रस्त्याची लांबी अवर्गीकृत करण्याबाबत विनंती केली आहे. तसेच सदर रस्त्यांच्या देखभाल -दुरुस्तीचा खर्च यवतमाळ नगरपरिषदेकडून करण्यात येईल असे मुख्याधिकारी, नगरपरिषद यांचेकडून देण्यात आलेल्या प्रतिज्ञापत्रामध्ये नमूद करण्यात आलेले आहे.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियता, सा.बां.प्रा.विभाग, अमरावती यांचा प्रस्ताव व त्याअनुषंगाने प्राप्त झालेला अहवाल, स्थानिक लोकप्रतिनिधीची विनंती तसेच संदर्भाधीन शासन निर्णयातील टिप ५ मधील तरतूद विचारात घेऊन, यवतमाळ जिल्ह्यातील यवतमाळ नगरपरिषद हद्दीतील खालील नमूद केलेले रस्ते अवर्गीकृत करण्यात येत आहेत.

१) बडनेर यवतमाळ वणी घुग्गुस प्रमुख राज्यमार्ग क्र.१४ कि.मी. २१५/८०० ते २१७/५०० (बसस्थानक चौक ते पांढरकवडा रोड यवतमाळ वळण रस्त्यापर्यंत) लांबी २.०० कि.मी.
२) नागपुरी बोरी तुळजापुर प्ररामा क्र. ६ कि.मी.१४६/०० ते १५०/०० (यवतमाळ बसस्थानक ते आर्णी रोड वनवासी मारोती) लांबी ४.००कि.मी.
३) अंजनगाव मुर्तीजापूर दारव्हा यवतमाळ राज्यमार्ग क्र.२८२ कि.मी. १६१/५०० ते १६५/४०० (दारव्हा रोड लोहारा ते बसस्थानक चौक यवतमाळ) लांबी ३.९० कि.मी.
४) चांदुर बाजार तिवसा धामणगांव यवतमाळ राज्यमार्ग क्र.३०० कि.मी. १२४/२०० ते १२८/७५० (धामणगांव नाका ते यवतमाळ पोस्ट ऑफीस) लांबी ४.५५० कि.मी.

अशी एकूण **१३.४५० कि.मी.** लांबी अवर्गीकृत करण्यात येत आहे. तसेच सदर रस्त्यांच्या देखभाल-दुरुस्तीचा खर्च यवतमाळ नगरपरिषदेकडून करण्यात येईल व अवर्गीकृत केलेल्या रस्त्यांवर होणाऱ्या देखभाल-दुरूस्ती करिता शासनामार्फत कोणतेही अतिरिक्त अनुदान देण्यात येणार नाही. तसेच मुख्याधिकारी, नगरपरिषद यांचेकडून देण्यात आलेल्या प्रतिज्ञापत्रामध्ये नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून सदर यवतमाळ नगरपरिषद हद्दीतील शहरातून जाणाऱ्या राज्यमार्गांना अवर्गीकृत करण्यास शासन मान्यता देत आहे.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०३१८१६४३०९५६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2017.03.18 16:44:06 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

२) विभागीय आयुक्त, अमरावती.

३) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, यवतमाळ (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

४) जिल्हाधिकारी, यवतमाळ.

५) मुख्याधिकारी, नगरपरिषद यवतमाळ.

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, यवतमाळ.

७) कार्यकारी अभियंता, (सा.बां.) जिल्हा परिषद, यवतमाळ.

८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई

९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

१०) निवडनस्ती.